सुधारीत प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.
बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जिल्हा सांगली.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रकल्प-१२१४/प्र.क्र.२४/टेक्स (ब)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ नोव्हेबर, २०१४.

**वाचा –**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सुतगि १२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दिनांक १३.६.२०००.
२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सुतगि ११२०००/प्र.क्र.१२५/ टेक्स-१(अ), दिनांक २.८.२००३
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सुतगि ११०८/ प्र.क्र.७०(२७)/टेक्स-१(अ), दिनांक ०७.०६.२००८
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सुतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दिनांक ३०.६.२०११
५) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कार्या ६(१)/सुतगि/१५५१ /२०१४, दिनांक १४.२.२०१४.
६) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कार्या ६(१)/सुतगि/८८५४ /२०१४, दिनांक १४.०८.२०१४.
७) शासन पत्र, सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक प्रकल्प-१२१४/प्र.क्र.२४/टेक्स-१(ब), दिनांक २४.११.२०१४.

**प्रस्तावना –**

आठव्या पंचवार्षिक योजना काळात सहकारी सूत गिरण्यांना शासकीय अर्थसहाय्य करण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे. बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जिल्हा सांगली या सूतगिरणीची आठव्या पंचवार्षिक योजना काळात अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली आहे. शासनाने दिनांक ३०.०६.२०११ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील सहकारी सूत गिरण्यांच्या प्रकल्प अहवालाची सुधारीत प्रकल्प अहवालाची किंमत रु.६१७४.२४ लाख इतकी निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार या सूतगिरणीने महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई यांचेकडून २५२०० चात्यांचा सुधारीत प्रकल्प अहवाल तयार करुन शासनाच्या मंजूरीसाठी सादर केलेला आहे. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ५ व ६ अन्वये सदर प्रकल्प अहवाल सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी सादर केलेला आहे. सुकाणू समितीच्या दिनांक १९ नोव्हेंबर, २०१४ रोजी झालेल्या बैठकीत सदर सूत गिरणीच्या प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जिल्हा सांगली या सूत गिरणीच्या प्रकल्प अहवालाची एकूण रुपये ५५०९.७९ लाख किंमत समितीने मान्य केली. ही किंमत शासनाने दि.३०.६.२०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या मॉडेल प्रकल्प अहवालातील किंमतीच्या मर्यादेत असल्याने, बाबासाहेब देशमुख शेतकरी

सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जिल्हा सांगली या सूत गिरणीच्या रुपये ५५०९.७९ लाख एवढया प्रकल्प किंमतीस मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय -

शासन आता बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जि. सांगली या सूत गिरणीच्या २५२०० चात्यांच्या रु. ५५०९.७९ लाख इतक्या प्रकल्प किंमतीस मान्यता देत आहे. सदर किंमतीपेक्षा अधिकचा खर्च लागल्यास सदर अतिरिक्त खर्चाची रक्कम सूतगिरणीने स्वभाग भांडवल जमा करुन ती प्रकल्पावर खर्च करावी या अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. शासनाच्या विद्यमान धोरणानुसार प्रकल्पाचा वित्तीय आकृतिबंध १:१ या प्रमाणात भाग भांडवल व कर्ज असा राहील. सूत गिरणीचे सभासद भाग भांडवल व शासकीय भाग भांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधीची उपलब्धता करावयाची आहे :-

| | | (रुपये लाखात) |
|---|---|---|
| अ) | सभासद भाग भांडवल | रु. २७५.४९ |
| ब) | शासकीय भागभांडवल | रु.२४७९.४१ |
| क) | दीर्घ मुदती कर्ज | रु. २७५४.८९ |
| | **एकूण** | **रु.५५०९.७९** |

३. सूतगिरणीने रु.५५०९.७९ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा जास्त रक्कम लागल्यास सदरची जास्तीची रक्कम सूत गिरणीने स्वबळावर उभी करणे आवश्यक राहील. शासन या जास्तीच्या रकमेस मान्यता देणार नाही. तसेच अतिरिक्त होणारा खर्च सूत गिरणीला स्वत: करावा लागेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२६१४५५४०३७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anilkumar Ramdaspant Ugle

Digitally signed by Anilkumar Ramdaspant Ugle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anilkumar Ramdaspant Ugle
Date: 2014.11.26 15:54:40 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
२) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

४) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, मुंबई,
६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई ४०० ००१,
७) कार्यासन अधिकारी, १६ सी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत),
९) अध्यक्ष, बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या.,आटपाडी, जि.सांगली
१०) निवड नस्ती (टेक्स १ (अ)/(ब) ).

**शासन निर्णय क्रमांकः प्रकल्प-१२१४/प्र.क्र.२४/टेक्स (ब), दिनांक २६नोव्हेंबर, २०१४**
**सोबतचे विवरणपत्र**

**बाबासाहेब देशमुख शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., आटपाडी, जिल्हा सांगली या सूत गिरणीचा सूधारीत प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तपशिल खालील प्रमाणे आहे -**

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | प्रकल्पाची सुधारीत प्रकल्प किंमत |
|---|---|---|
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ५८.०० |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकाम | ८४२.७९ |
| ३ | प्लॅट अँड मशिनरी | ३०६२.०३ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ७२९.३२ |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ६०.९५ |
| ६ | प्रिऑपरेटिव्ह खर्च | १८१.०० |
| ७ | मार्जीन मनी | ३०१.९३ |
| ८ | कॉन्टीजसी | २७३.७७ |
| एकूण | | **५५०९.७९** |